**क्रांतिकारी अनंत कान्हेरे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, खेड, जि. रत्नागिरी या संस्थेच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग,**
**शासन निर्णय क्र : मंजूरी २६११/२०२४/प्र.क्र.८३ /व्यशि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक :- २४ मार्च, २०२५.

**वाचा :**

१) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. १४/मालमत्ता/ औप्रसं खेड/२०२४/२४६, दि. ०२.०८.२०२४.
२) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांचे पत्र क्र. १४/मालमत्ता/ औप्रसं खेड/२०२५/५८, दि. ०३.०२.२०२५.
३) वित्त विभाग शासन निर्णय, क्रमांक : क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९.
४) नियोजन विभाग शासन निर्णय क्र. ससमा २०१०/प्र.क्र.४८ (भाग-१)/का-१४६१, दि. ११ जून, २०१८.

**प्रस्तावना :-**

शासकीय तांत्रिक विद्यालय, खेड व औद्योगिक प्रशिक्षण संस्था (क्रांतिकारी अनंत कान्हेरे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था), खेड, जि. रत्नागिरी या संस्थेचे कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामासाठी क्र. शातांवि/२००८/(३३९/०८)/व्यशि-३, दि. ०३ जुलै, २००८ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु. २,९८,८३,०००/- (रु. दोन कोटी अठ्याएण्णव लाख त्र्याऐंशी हजार फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता दिली होती. तथापि, प्रशासकीय कारणास्तव सदर बांधकाम सुरु करण्यात आले नाही व प्रशासकीय मान्यतेअन्वये मंजूर निधी वापरण्यात आला नसल्याने, संचालनालयाच्या विनंतीनुसार सदर प्रशासकीय मान्यता रद्द करुन नव्याने क्रांतिकारी अनंत कान्हेरे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, खेड, जि. रत्नागिरी या संस्थेकरिता नवीन प्रशासकीय इमारतीचे बांधकामाचे रु. १३४६.५० लक्ष (अक्षरी तेरा कोटी सेहचाळीस लाख पन्नास हजार मात्र) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

१. संचालक, व्यवसाय व प्रशिक्षण संचालनालय यांनी संदर्भाधित क्र. १ व २ येथील पत्रान्वये क्रांतिकारी अनंत कान्हेरे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, खेड या संस्थेचे बांधकामाचे रक्कम रु. १३४६.५० लक्ष (अक्षरी तेरा कोटी शेहचाळीस लाख पन्नास हजार मात्र) चे अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केला होता. सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारित सदर अंदाजपत्रके कनिष्ठ अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, खेड यांनी तयार केलेले असून सदर अंदाजपत्रक १. कार्यकारी अभियंता चिपळूण, सार्वजनिक बांधकाम विभाग, चिपळूण, २. अधीक्षक अभियंता, रत्नागिरी(सा.बां.) विभाग, रत्नागिरी यांनी सांक्षाकित केलेले आहे.

२. कनिष्ठ अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, खेड यांनी यांनी सादर केलेल्या Recapitulation Sheet प्रमाणे प्रस्तावित करण्यात आलेली एकुण रु. १३४६.५० लक्ष (अक्षरी तेरा कोटी शेहचाळीस लाख पन्नास हजार मात्र) इतकी रक्कम परिगणीत करण्यात आली असून Recapitulation Sheet सोबत जोडले असून त्यावर मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, कोकण यांनी तांत्रिक मान्यता दिली आहे.

३. क्रांतिकारी अनंत कान्हेरे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, खेड येथे नवीन इमारत बांधकाम करण्याकरिता रु. १३४६.५० लक्ष (अक्षरी तेरा कोटी शेहचाळीस लाख पन्नास हजार मात्र) रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटीं व शर्तीच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१. काम सुरु करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वस्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच सुरु करावे.
२. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतूदीबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.
३. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय, क्र.इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०/०१/२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वांनुसार कार्यवाही करण्यात यावी.
४. सार्वजनिक बांधकाम विभाग, शासन निर्णय क्र.बीडीजी २०१७/प्र.क्र.६०/इमा-२, दि.०७/०७/२०१७ अन्वये कार्यवाही करण्यात यावी.
५. नियोजित जागा उपभोक्ता विभागाच्या ताब्यात असल्याचे प्रमाणपत्र प्राप्त करुनच सदर कामाच्या निविदा सूचना प्रसिध्द करण्यात याव्यात.
६. सदर अंदाजपत्रक सन २०२२-२३ च्या दरसूचीवर आधारित आहे.
७. सदर कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, याद्दष्टीने विशेष दक्षता घेण्यात यावी.
८. प्रस्तुत कामासाठी अर्थसंकल्पात तरतूद केल्याशिवाय बांधकाम हाती घेण्यात येऊ नये.
९. प्रस्तावित जागेवर वृक्षतोड होणार असल्यास स्थानिक प्राधिकरणाची पूर्व मंजूरी प्राप्त करुन घ्यावी.

४. सदर बांधकामासाठी येणारा खर्च " मागणी क्र. एच-९, ४२५०, इतर सामाजिक व सामूहिक सेवांवरील भांडवली खर्च, २०१ कामगार - शिल्प कारागीर प्रशिक्षण पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - राज्य योजनांतर्गत योजना प्रादेशिक असमतोल दूर करण्यासाठी योजना इमारती (००) (००) (०४) मोठी बांधकामे (कार्यक्रम) (४२५००११४) ५३, मोठी बांधकामे " या लेखाशिर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

५. शासकीय तांत्रिक विद्यालय, खेड व औद्योगिक प्रशिक्षण संस्था, खेड, जि. रत्नागिरी या संस्थेचे कार्यशाळा व प्रशासकीय इमारत बांधकामासाठी शासन निर्णय क्र. शातांवि/२००८/(३३९/०८)/व्यशि-३, दि. ०३ जुलै, २००८ रोजी अन्वये रु. २,९८,८३,०००/- (रु. दोन कोटी अठ्याएण्णव लाख त्र्याऐंशी हजार फक्त) च्या अंदाजपत्रकास देण्यात आलेली प्रशासकीय मान्यता रद्द करण्यात येत आहे.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक : क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम (भाग-२), दि.२०/०९/२०१९ अन्वये सुधारीत केलेल्या वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील अ.क्र.१, परिच्छेद क्रमांक १३४ (१) अन्वये प्रशासकिय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२४१४५१२१३८०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

AMEY ANIL GAWADE

Digitally signed by AMEY ANIL GAWADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SKILLS EMPLOYMENT ENTREPRENEURSHIP AND INNOVATION DEPARTMENT, 2.5.4.20=20b5439bf6337ac786acb2d216dfff86804484eb90f4d3512213f2618f39657e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=11EB206D5E1B6D85776EB1F62A6FADEF79AFB18099A51B276758D0FFAA4C4F30, cn=AMEY ANIL GAWADE
Date: 2025.03.24 14:52:13 +05'30'

**(अमेय अ. गावडे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :**

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुलूंड (पूर्व), मुंबई.
३. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, रत्नागिरी.
४. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, चिपळूण.
५. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, रत्नागिरी परिक्षेत्र, रत्नागिरी.
६. प्राचार्य, क्रांतिकारी अनंत कान्हेरे शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, खेड, जि. रत्नागिरी.
७. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई (इमारती-२).
८. व्यशि-२ (निवडनस्ती) कौशल्य, रोजगार, उद्योजकता व नाविन्यता विभाग, मंत्रालय, मुंबई.